राज्यातील ३४९ तालुका आरोग्य अधिकारी कार्यालयातील १०४७ अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय, क्रमांकः पदआ २०१८/प्र.क्र. १०५/आरोग्य ३
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ ऑक्टोंबर, २०१८.

वाचा :

1) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पदआ २०१८/प्र.क्र.१०५/आरोग्य ३, दिनांक २४.०४.२०१८.
2) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/ ७-अ/टे-८/टीएचओ/अस्थाई पदे/चालू ठेवणे/ १५७६-७७/२०१८, दिनांक ०९.०४.२०१८.

शासन निर्णय :

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये ठाणे, उल्हासनगर, पुणे शहर व नागपूर शहर ही ठिकाणे वगळून राज्यातील एकूण ३४९ तालुका आरोग्य अधिकारी कार्यालयातील प्रत्येकी ३ याप्रमाणे एकूण १०४७ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक ३०.०९.२०१८ या कालावधीकरीता पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये सदर ३४९ तालुका आरोग्य अधिकारी कार्यालयातील १०४७ अस्थाई पदे दिनांक ०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदावरील खर्च खालील नमूद लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१८-१९ या वर्षाकरीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा :-

मागणी क्रमांक - आर-१,
मुख्यलेखाशिर्ष "२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
८०० - इतर खर्च,
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना

राज्य योजनांतर्गत योजना
००१- किमान गरजा कार्यक्रम,
(०१)(०२) - प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामिण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (२२१० ०५३१)"

४. हा निर्णय,शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-पदनि २०१६/प्र.क्र. ८/आपुक,दि ०७.०९.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१२१३२४२६६४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.10.15 14:47:31 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल १/ २ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
६. सर्व उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ.
७. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी.
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९. सर्व तालुका आरोग्य अधिकारी कार्यालये.
१०.वित्त विभाग (कार्यासन- व्यय-१३/ अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
११.सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन- सेवा-२/अर्थसंकल्प).
१२.निवडनस्ती (आरोग्य ३).